इत्यर्थ
वर्ष दुसरे अंक पहिला
एप्रिल २०१३

संपादक:
सृजा (औरंगाबाद)

सहभाग  व सहकार्य : पूर्वा कदम.



.

संपर्क: ई-साहित्य प्रतिष्ठान
जी-११०२, अकरावा मजला,
ईटर्निटी, तीन हात नाका,
इस्टर्न एक्स्प्रेस हायवे,
ठाणे पश्चिम.   ४००६०४.
मो.  ९८६९६७४८२०

वेबसाईट : www. esahity. com,    etyarth. blogspot. in

ईमेल: esahity@gmail. com,   etyarth. esahity@gmail. com.

# संपादकीय

नमस्कार वाचक मित्रहो.

बऱ्याच दिवसांनंतर आपली भेट होते आहे त्याबद्दल सर्वप्रथम दिलगिरी व्यक्त करते. काही कारणास्तव इत्यर्थचा पहिला वाढदिवसही साजरा होऊ शकला नाही. पण आता आम्ही नव्या जोमाने आलो आहोत आणि काही नव्या कल्पना अंमलात आणण्याचे प्रयत्न करत आहोत.

ऑगस्ट सुरू आहे आणि सगळीकडे यावेळी समाधानकारक  पाऊस आहे. श्रावणामुळे धार्मिक वातावरण आहे. गोपाळकाल्याची धूम आहे. यासोबतच यंदा आम्ही घेऊन येत आहोत थोडी वैज्ञानिक माहिती. आपली संस्कृतीआणि सण-वार यांची माहिती आपल्याकडे एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे दिली जाते. पण आपल्या देशाच्या बाहेर या महिन्याचं काय महत्व असू शकतं याची माहिती मात्र आपल्याला बाहेरूनच मिळवावी लागते.

तर मग यंदा आपण जाणार आहोत सुदूर उत्तरेकडे. म्हणजे कॅनडा, नॉर्वे, स्विडन, उत्तर रशिया यांसारख्या उत्तर ध्रुवाजवळील प्रदेशांत आणि जाणून घेणार आहोत एका नैसर्गिक आश्चर्याबद्दल. या अंकात दर दोन लेखांमध्ये तुम्हाला एक सुंदर फोटो टाकलेला आढळेल. हे सर्व फोटो फोटोशॉपमध्ये बनवलेले नसून अगदी खरे आहेत. आणि आकाशात पसरलेला हा सुंदर प्रकाशच या महिन्याचा विशेष आहे.

जो सुंदर प्रकाश तुम्हाला दिसतो आहे त्याला मराठीत ध्रुवीय प्रकाश किंवा इंग्रजीत Aurora Borealis  असं म्हणतात. पृथ्वीच्या आयनांबरापलीकडे सूर्य आणि इतर खगोलांकडून येणारे सौर वारे (Solar Winds) तसेच विद्युतचुंबकीय लहरींच्या प्रभावा मुळे प्रचंड भारित कण (इलेक्ट्रॉन्स) तयार होतात. या कणांचे विशाल झोत जेव्हा एकमेकांवर आदळतात तेव्हा हे नयनमनोहर प्रकाश पहावयास मिळतात

या प्रकाशझोतांचा प्रभाव साधारणतः ३ ते ६ अंश अक्षांशाच्या भागात दोन्ही गोलार्धात दिसतो. आणि हा ध्रुवीय प्रकाश सर्वात जास्त पहायला मिळतो तो ऑगस्ट महिन्यात! सर्व प्रकारचे रंग आणि आकार इथे पहायला मिळतात.ज्यावेळी आपण आपल्या श्रावणमासाचा आनंद उपभोगतो त्याच वेळी सुदूर उत्तरेला अवकाशात ही रंगपंचमी होत असते.

यंदाचं मुखपृष्ठही याच थीमला अनुसरून ठेवलं आहे. आजपासून बरोबर तेरा वर्षांपूर्वी कॅनडाच्या आकाशात ध्रुवीय प्रकाश आणि तळपता धूमकेतू एकत्र पाहण्याचा योग जुळून आला. आणि नव्या माहितिचं संकलनकरण्याच्या आपल्या या उपक्रमाचा शुभारंभ बनण्याचा मान त्या योगाच्या अत्यंत दुर्मिळ छायाचित्राला मिळाला.

तर हा होता ऑगस्ट महिना.. येत्या सप्टेंबर महिन्यात आपण साजरा करणर आहोत इंजिनियर्स डे! तर सगळ्याच इंजिनियर मित्रांच्या लेखांचं स्वागत आहे.

सृजा
etyarth.esahity@gmail.com

# आकाशातल्या ठोंब्याबद्दल ....!

काल जिममधून खाली उतरलो. साडेआठ वाजले होते. गाडी जवळ पोचताना जिमकडे जाणारा मित्र भेटला. हा बहुदा माझ्या बरोबर असतो, सातच्या सुमारास. आज इतक्या उशीरा येतोय म्हटल्यावर गुड मॉर्निंग ऐवजी साहजिकच माझ्याकडून त्याच्यावर प्रश्न आपटला गेला, "अरे, आज इतका उशीर का?" त्याचे स्पष्टीकरण चालु झाले. "काल श्रावण संपला ना, त्यामुळे रात्री उशीरा पर्यंत 'बसलो' होतो. श्रावणाच्या म्हैनाभरात सॉलिड तहान लागली होती. मित्रही होते बरेच. दहा दिवस आधीच ठरवून ठेवले होते. फार मजा केली. एकदम आउट ! पार कल्ला केला. आता आणि दहा दिवस बंद ना. गणपती आहे, बाप्पा. आपण नाही गणपतीत घेत. त्यामुळे आज जरा उशीर झाला." मी, "ओके, गुड डे." एवढंच म्हणालो. मित्राच्या निवेदनाला लॉग आउट केलं आणि गाडीकडे सटकलो.

गाडीत नेमका गुलाम अली 'हंगामा है क्यो बरपा, थोडीसी जो पीली है..' ची अर्धवट राहिलेली गझल संपवत होता. त्यामुळे मित्राच्या कालपर्यंत दाटून आलेल्या कंठाची पुन्हा एकदा आठवण झाली. प्यायची तर बिनधास्त प्यायची ना. श्रावण किंवा गणपतीसाठी स्वत:वर बलात्कार कशाला? दहा दिवस आधी प्लानिंग म्हंजे त्याही वेळी इच्छा झालीच असेल ना. प्यावेसे वाटले असेलच ना. आणि गणपती यायच्या आधी एकच दिवसाचा चान्स मिळाल्यावर आधीच्या महिना भराची आणि नंतरच्या दहा दिवसांची एकत्र पिऊन घ्यायची हा केव्हढा त्रास? आणि कशासाठी? आणि त्या दिवसांमध्ये इच्छा होऊन प्यायची का नाही? तो एकच दिवस जो मध्ये होता त्या दिवशीच का चालते ? माझा मानसीक त्रास असा होता की त्या महिन्यात आणि नंतरच्या दहा दिवसात असा काय फरक असतो ज्यामुळे आपल्या इच्छांचे दमन माझ्या मित्रांना करावे लागते? या श्रद्धाळू लोकांची गणितं मला कधीच कळत नाहीत. वर्ष भर कुणाचा ना कुणाचा असा त्रास असतोच. परवा पार्टी करू असं ठरवायचं असेल तर एकजण तरी म्हणतोच ' मित्रा परवा गुरुवार आहे बरं का, दत्ताचा वार आहे. दुसरा दिवस निवडा.' श्रद्धेचा आणि या बलात्काराचा नैतिक सबंध काय ?

गणपतीच्या आदल्या दिवशी काय नसतं जे त्या दहा दिवसात असतं? म्हंजे आदल्या दिवशी गणपती पिताना बघत नाही का? तो आलेला नसतो म्हणुन त्याला चालतं की तो आलेलाच नाही त्यामुळे त्याला विचारायचा संबंधच काय? किंवा तो आलेला नसल्यामुळे तो बघू शकत नाही, त्याला समजतच नाही.

या पिण्याच्या पार्श्वभूमीवर तर एक भारी किस्सा आहे माझ्याकडे. आमच्या गावात म्हंजे निपाणीला एक देवी असते. बहुतेक ग्रामदेवता वगैरे. कारण ती एका किल्ल्यात असते. जुना भुईकोट किल्ला असतो नवरात्रात मोठा उत्सव असतो. असणारच. देवी आहे. दसऱ्याच्या पूजेला देवीला चक्क दारूचा नैवेद्य दाखवतात. आणि नैवेद्य म्हंजे असं छोट्याश्या वाटीत चमचाभर वाढून नाई देत. डायरेक्ट बाटली - म्हंजे क्वार्टर - उघडतात आणि देवीच्या नाकाला लावतात. तशी पद्धतच आहे आणि मग तिचा चेहरा भक्तांना दाखवतात. पुण्यवान लोकांना  म्हणे तिचा झिंगता चेहरा आरशात दिसतो. खूप लहान असताना मला खूप टेन्शन यायचं कारण मला ती झिंग कधीच दिसली नाही. आता बोला.  देवाला हवी की नको? त्याच्या समोर चालते की नाही?

माझा त्याचा न्हंजे देवा बिवाचा फारसा सबंध माझ्या भर यौवनापासून नाहीच. म्हंजे त्यांच्या पैकी - गणपतीआदी - कुणाचाच  संपर्क नाही, फारसा परिचयही नाही. त्यामुळे त्यांच्या संदर्भात पाळायची पथ्ये ही फारशी माहिती नाहीत. पण वाचना मुळे त्यांच्या - म्हंजे दिवाबिवाच्या - काही खास बाबी माहिती आहेत. म्हंजे परमेश्वराने  चराचर  व्यापलेले आहे. आणि तो सगळीकडे असतो आणि आपण जे जे करतो त्याची म्हणे तो नोंद ठेवतो आणि त्या नोंदींचा रेफरन्स घेऊन मेल्यावर आपल्या पाप पुण्याचा म्हणे हिशोब तो मांडतो. मग आपले डीपार्टमेंट ठरवतो. म्हंजे नरक की स्वर्ग वगैरे. आता एव्हढी लांबलचक श्रद्धा ठेवणा-यांना हे माहिती नसतं का ? एखादे पाप करताना आपल्याला तो पाहतोय? गुप्तपणे ! त्यामुळे तो घरी आला काय किंवा नसला काय, फरक नाही पडला पाहिजे. त्याचा वार असला काय किंवा नसला काय, फरक नाही पडला पाहिजे कारण तो चराचर व्यापुन राहिलाय ना. भक्त प्रह्लादाने नाही का त्याच्या उद्दाम बापाला, हिरण्यकश्यपुला सांगितलं होतं की माझा नारायण सगळीकडे आहे. या खांबांमध्येही  आहे. त्याच्या बापाने मग खांबाला लाथ मारली. लाथ लागल्यामुळे रागावून त्यातून नरसिंह नामक नारायणाचा अवतार बाहेर आला .त्याने हिरण्यकश्यपुला मारून टाकलं. हे सगळयांना माहिती असेलच ना. म्हंजे श्रद्धाळूंना तरी. पण तरीही हेच श्रद्धाळू "चोरून" एखादी गोष्ट कशी करू शकतात? चोरून म्हंजे इकडे तिकडे कुणी बघत नाही असं बघून वा समजून! हो, म्हंजे डोळे मिटून दुध पिणाऱ्या मांजरीसारखं!

शिर्डीच्या एका भक्ताने कमाल केली. एक सोन्याने मढवलेली शाल बनवली. किमती हिऱ्यांचा भराव असलेली.एकदम महागडी. तशी सगळी कडे बातमी फुटली. टीव्हीवर, पेपरात, इमेल वर दणका चालु झाला. करोडो रुप्याची शाल. भल्या भल्या भक्तांना फ्रस्ट्रेट करून टाकलं. त्याना वाटलं हा सगळयात जवळ जाणार बाबांच्या. आपल्या पुढे. आपण तर फक्त चांदीचा मुकुटच चढवलाय. पण थोड्याच दिवसात गंमत झाली. ती सोन्याची शाल खोटी असल्याची देवस्थानाला कुणीतरी सांगितलं. तो हिरो हे 'प्रामाणिक' पणे कबुल करून रिकामा झाला. मला तेच म्हणायचंय. देवावर आहे ना तुमचा विश्वास? मग तो सगळीकडे आहे हे कसं काय बुवा ही जनता विसरू शकते ? कित्येक चोरांच्या बातम्या टीव्हीवर वगैरे असतात ना. अमकी चादर चढवली. तमकी पूजा बांधली. या जनतेवर भ्रष्टाचाराचे, धमकी दिल्याचे वा अन्य कसले तरी हमखास आरोप कसे असतात? त्या जेडेच्या मारेक-याचा कुठल्यातरी देवावर विश्वास होता. खून केल्यावर तो पहिल्यांदा त्या देवाला गेला असे कुठेतरी वाचलं. म्हंजे येडं कोण आहे? जनता की देव?

भक्ती बरोबर येणारी नैतिकता मला कधी दिसत नाही त्यामुळेही त्याचे आणि आपलं कधी जमलंच नाही. तो एकतर नसावाच किंवा असला तर अत्यंत अकार्यक्षम म्हंजे ढिम्म असावा. कुठे दिसला नाही त्यामुळे आपण नाही त्याच्या मागे धावणार असं म्हटलं तर हमखास एक टोमणा कानावर येतो की तो पापी लोकांना दिसत नाही. हो पण माझे जाऊ द्या हो. तो असेल तर काही ठिकाणी त्याने त्याचा प्रताप दाखवायलाच हवा होता.

पंधरा वीस दिवसापूर्वी असेल, एका कार्यालयात वाट बघत मुंबईत बसलो होतो. वेळ घालवायला समोर टेबलावर पडलेला टाइम्स ऑफ इंडिया चाळायला घेतला. ती बातमी वाचायची नव्हती पण परत परत तिकडे डोळे जात होते. शेवटी डोळ्यांनी माझ्या मनाला घट्ट पकडलं आणि त्या बातमीवर घेऊन गेले. घटना मुंबईतली. एक चिमुरडी सुमारे आठ नऊ वर्षाची. बिस्कीट आणायला घराजवळच्या दुकानाकडे उड्या मारत चाललेली. वाटेत तिचा बाप भेटला. तो हल्ली फारसा घरी नसतो. बाबा भेटल्यावर चिमुरडीला आनंद झाला. तो म्हणाला चल माझ्याबरोबर. तश्याच उड्या मारत ती बाबा बरोबर गेली. एक २०- २१ वर्षाच्या पोराकडे तो बाप तिला घेऊन गेला. त्याला म्हणाला ही घे तुला. हिचे काय करायचं ते कर. त्या हरामखोर बापाला आईने घराबाहेर काढलं होतं. कारण आपल्याच तीस वर्षाच्या पोरीबरोबर त्याला झोपायचं होतं. घराबाहेर काढलं म्हणुन तो बायकोवर चिडला होता. तिचा बदला घ्यायचा होता. तो २०- २१ वर्षाचा गुंड तिला एका स्टेशनवर घेऊन गेला. वारंवार तिच्यावर बलात्कार त्याने केला. काम झाल्यावर रुळाशेजारच्या एका नाल्यात तिला फेकून दिली. वेदनेनं बेजार झालेली चिमुरडी आक्रोश करत त्या दलदली मध्ये गटांगळया खाऊन मेली.

मला वाचून दरदरून घाम फुटलेला. शरीर प्रचंड थरथरत होतं. पळत फ्रेश रूम मध्ये जाऊन उलटी होते का पाहिलं. जमलं नाही. धावत गाडी कडे गेलो. बसलो. सुरु केली. लांबवर गेलो. काचा बंद केल्या आणि जोरजोरात पाच मिनिटं किंचाळलो. थोडा मोकळा झालो. ....... मी कदाचित पापी असेन. मला आकाशातला मायबाप दिसत नाही हे मान्य पण त्या चिमुरडीचं काय? तिचा काय हो दोष? पाप आणि पुण्याच्या चक्रात अजुन अडकलेलाही नव्हता तो जीव. मग तिच्यावर एव्हढा भीषण अत्याचार होताना चराचर व्यापलेला तो परमेश्वर करत काय होता, शेजारी उभा राहुन?

तो असेल वा नसेल. मी दखल घेण्याच्या लायकीचा तो नक्की नाही, माझ्या वयाच्या सोळाव्या वर्षापासूनच…

सुधीर मुतालीक, नाशिक. "sudhirmutalik@gmail.com"

# कृतार्थ प्राण

वर्ष १९३९, शहर लाहोर, स्थळ - लाहोरची - हिरामंडी, वेळ रात्रीची. रात्रीचे जेवण झाल्यानंतर पान खाण्यासाठी तीन - चार तरुण पानाच्या ठेल्यासमोर उभे आहेत. त्यातलाच एक गोरागोमटा देखणा तरुण, एका छायाचित्रकाराचा सहाय्यक म्हणून काम करणारा, जेवणापूर्वी थोडेसे नशापाणी करून आलेला. त्याच्यापासून काही अंतरावर उभा असलेला एक माणूस या तरुणाला न्याहाळतोय, त्याच्या मनात तो भरलाय, त्याचे राजबिंडे व्यक्तिमत्व त्याला आवडलेय. तो जवळ जाऊन त्या तरुणाला प्रश्न विचारतो. जणू नियतीच त्याच्या तोंडून प्रश्न विचारतेय. .

तुझे नाव काय?

त्रासिक चेहऱ्याने तो तरुण विचारतो 'तुम्हाला काय करायचं?' त्यावर तो माणूस म्हणतो, कृपया गैरसमज करून घेऊ नका. माझं नाव वली, मोहम्मद वलीं. मी एक लेखक आहे. प्रसिद्ध फिल्म निर्माते दलसुख पांचोली यांनी नुकताच माझ्या एका कथेवर चित्रपट निर्माण केला आहे. मी आता त्यांच्या नवीन सिनेमा साठी एक दुसरी कथा लिहितोय. त्या सिनेमाचे नाव आहे 'यमला जट' ज़ो पंजाबी मध्ये बनणार आहे. मी मघापासून तुमच्या हालचाली बघतोय. ती तुमची पान खाण्याची स्टाईल, बोलण्याची लकब. माझ्या कथेमध्ये एक character आहे, जे हुबेहूब तुमच्या व्यक्तिमत्वाशी जुळते. तुम्हाला माझ्या सिनेमात काम करायला आवडेल का ?

'नाही' तो तरुण तडकाफडकी उत्तर देतो. 'ठीक आहे, तरी पण हे माझे visiting card घ्या, विचार करा आणि उद्या लाहोरच्या पांचोली आर्ट स्टुडीओ मध्ये सकाळी १० वाजता मला भेटायला या'..

तो तरुण दुसऱ्या दिवशी स्टुडीओत जात नाही. आदल्या दिवशीची वली साहेबांबरोबरची भेटही विसरून जातो, पण नियती त्याला तसे सोडणार नसते. त्याच्या पुढच्या शनिवारी तो तरुण परत मित्रांबरोबर लाहोरच्या प्लाझा सिनेमा मध्ये पिक्चर बघायला जातो. परत त्याची योगायोगाने वली साहेबांशी गाठ पडते. त्याला (न आल्याबद्दल) पंजाबी मध्ये शिव्यांची लाखोली वाहतात क़ेवळ त्यांचा राग शांत व्हावा म्हणून तो तरुण दुसऱ्या दिवशी त्यांच्या बरोबर स्टुडीओत जातो. त्याचे फोटो काढले जातात, स्क्रीन टेस्ट घेतली जाते.

अंतिमतः त्याची 'यमला जट‘ या चित्रपटातील खलनायकाच्या भूमिकेसाठी निवड केली जाते. पन्नास रुपये महिना या अटीवर करारही होतो. 'पण सर, तो तरुण चाचरत म्हणतो 'मला फोटोग्राफी मध्ये सध्या महिना २०० रुपये मिळतात.' ठीक आहे,मग फोटोग्राफर म्हणून काम करत रहा. आम्हाला जेव्हा शूटिंगच्या वेळी तुझी गरज भासेल तेव्हा आम्ही तुला बोलवु. अरे भल्या माणसा, तुला समजत कसे नाही, आज तू पन्नास रुपयाच्या करारावर सही कर. भविष्यात हाच करार तुला लाखोंच्या राशीत लोळवेल. अशी संधी लाथाडू नकोस. हो म्हण आणि सही कर.' पांचोली स्टुडीओ चे मालक दलसुख पांचोली वडिलकीचा सल्ला देत होते. त्या तरुणाने थोडा विचार केला. करार पत्र समोर ओढले व आयुष्यातला पहिला सिनेमा contract साईन केला. खाली लफ्फेदार अक्षरात सही केली 'प्राण किशन सिकंद'!

१२ फेब्रुवारी १९२०जुनी दिल्लीच्या बालीमारन (हो, तेच बल्लीमारान, जिथे गालिब रहात असे) इथे जन्मलेल्या प्राणचा 'यमला जट' हा पहिला पंजाबी चित्रपट. पण त्यांना व्हायचे होते फोटोग्राफर. मेट्रिकच्या परीक्षेनंतर पुढील शिक्षणात मन रमत नसल्याने प्राणने वडिलांकडे फोटोग्राफी शिकण्याची इच्छा व्यक्त केली. वडिलांनी मित्राच्या A. Das & Co. या त्या वेळच्या सुप्रसिध्द फोटोग्राफरकडे apprentice म्हणून लावून दिले. तिथे ते developing & printing पण शिकले. पण नियतीने त्यांना मायानगरीत आणून सोडले. सुरुवातीला चौधरी, खजांची, या चित्रपटात खलनायकाचे काम केल्यानंतर 'खानदान‘ मध्ये नूरजहान बरोबर नायकाची भूमिका देखील केली पण पडद्यावर स्वतःला नायिकेच्या मागे झाडामागे पळताना, गाताना बघून त्यांनाच आवडले नाही. तेव्हाच त्यांनी ठरवले की अशाच चित्रपटात काम करायचे ज्यात आपल्याला पडद्यावर गावे लागणार नाही.

१९४५ ते १९४७ चा तो काळ. भारतात स्वातंत्र्याचे वारे वाहायला लागले होते. लाहोरला १५-२० चित्रपटात काम करून झाले होते. ४७ च्या ऑगस्ट महिन्याच्या पहिल्या आठवड्यात प्राण आपल्या मुलाचा वाढदिवस साजरा करायला लाहोरहून इंदोरला आला होता. एका रात्री रेडीओ वरून बातमी आली की लाहोर मध्ये रक्तपात झालाय. फाळणीच्या जाणीवेने लोकांची माथी भडकली होती. लोक एकमेकांच्या जीवावर उठले होते. लाहोरला परतायचे दरवाजे असे अचानक बंद झाले होते . १५ ऑगस्ट ला भारत स्वतंत्र झाला. प्राण सारख्या ज्यांनी लाहोरला आपले घर मानले होते ते घर आता दुसऱ्या देशाचा भाग झाले होते. बायको ला बरोबर घेऊन हिंदी चित्रपट सृष्टीत नशीब आजमावण्यासाठी प्राण मुंबईत येऊन दाखल झाला. त्यानंतर त्यांना पुढील आयुष्यात अनेक वेळा पाकिस्तानहून लाहोर भेटीची आमंत्रणे आली पण ते कधीच लाहोरला गेले नाहीत. ज्या मातीतून त्यांना जबरदस्तीने हाकलण्यात आले, त्या मातीची ओढ त्यांना कधीच वाटली नाही. फाळणीची भळाळती जखम उराशी धरूनच ते आयुष्यभर जगले.

१९४७ साली पत्नी शुक्लासह मुंबईत आल्यावर प्राण सुरुवातीला ताज हॉटेल मध्ये राहिला (४७ साली ताजचे भाडे होते दिवसाला ५५ रुपये फक्त अन तेही ब्रेकफास्ट, लंच व डिनर सह !)मग सुरु झाल्या एका स्टुडीओतून दुसऱ्या स्टुडीओत काम मागण्यासाठी चकरा. पण ही वाट वाटली तेवढी सोपी नव्हती. हळू हळू त्यांच्याजवळचे होते-नव्हते ते पैसे समाप्त झाले. पत्नीच्या सोन्याच्या बांगड्या विकायची वेळ आली. ताज मधून कमी ग्रेडच्या हॉटेल मध्ये स्थलांतर सुरु झाले. असे बेकारीचे आठ महिने गेल्यावर एक दिवस अचानक Bombay Talkies मधून प्राणला फोन आला. ते नवीन कलाकारांना घेऊन जिद्दी हा चित्रपट काढत होते. नव्या हिरोचे नाव होते देव आनंद, नवीन हिरोइन होती कामिनी कौशल आणि खलनायकाच्या भूमिकेसाठी प्राणला साइन करण्यात आले ते ५०० रु. च्या करारावर. (त्यावेळी हे तिघे प्रमुख नट चर्चगेट हून लोकल ट्रेन ने मालाडला जायचे. मालाड स्टेशनहून चालत स्टुडीओत जायचे व संध्याकाळी शूटिंग संपल्यावर मालाड-चर्चगेट हा परतीचा प्रवास करायचे.

आठ महिने बेकारीतून होरपळल्यानंतर (!) नशिबाने साथ द्यायला सुरुवात केली होती. जिद्दी नंतर आठ दिवसात अपराधी, पुतली, गृहस्थी या चित्रपटांच्या ऑफर्स आल्या. मग आला प्राणच्या खलनायकाच्या कारकीर्दीवर शिक्कामोर्तब करणारा रेहमान, सुरैया, गीता बाली बरोबरचा 'छोटी बहेन'(चले जाना नही नैन मिलाके, चूप चूप खडे हो जरूर कोई बात है, वो पास रहे या दूर रहे, नजरोमे समये रहते है – संगीत - हुस्नलाल - भगतराम) इथूनच सुरुवात झाली भारतीय सिनेमाच्या नंबर वन 'Baddy'ची. नंतरच्या काळात या ब्याडीच्या वाटेला उतमोत्तम खलनायकाच्या भूमिका येत गेल्या. प्राणनेही आपल्या ढंगाने त्यात अभिनयाचे गहिरे रंग भरले. हलाकु, आशा, मधुमती, अदालत, अफसाना, मुनीमजी, चोरी चोरी, तुमसा नही देखा या सारख्या सिनेमातून प्राण आपले villain चे स्थान पक्के करत होता. हिरोइनच्या मागे झाडाच्या आडून इकडे-तिकडे पळत, रोमान्स करत गाणं म्हणणाऱ्या Goody Goody हिरो च्या भूमिका करणं त्याला जमत नव्हतं. तशी त्याची इच्छाही नव्हती.

राज-दिलीप-देव या त्याकाळच्या त्रिकुटाच्या प्रेमात बिब्बा घालणारा हा प्राणच असायचा. देव आनंद बरोबर जिद्दी, मुनीमजी, अमरदीप, जब प्यार किसीसे होता है या सिनेमातून villain च्या भूमिका केल्यानंतर जॉनी मेरा नाम, देस परदेस, मध्ये मोठ्या भावाची तर वॉरंट मध्ये वडिलांची भूमिका प्राणने केली .

दिलीप कुमारसह आझाद, देवदास, मधुमती, दिल दिया दर्द लिया, आदमी, गोपी यात खलनायक म्हणून चमकला. पण आजही आपल्या लक्षात राहतो तो 'राम और शाम ' मधला दिलीप कुमारला चाबकाने फोडून काढणारा प्राणचा गजेंद्र !

राज कपूरच्या चोरी चोरी, छलिया, दिल ही तो है यात काम केल्यावर प्राणने मेरा नाम जोकरच्या अपयशानंतर कर्जाच्या खाईत लोटलेल्या राज कपूरच्या बॉबीत केवळ एक रु. मानधनावर काम केले होते. (बॉबी हिट झाल्यावर राज कपूरने त्याचे योग्य ते मानधन पाठवले हा भाग वेगळा) आर. के.च्या जिस देशमे गंगा बहती है मधला राका डाकू ही प्राण ची भूमिका मात्र आपण विसरू शकत नाही. याच राज कपूर ने प्राण ला त्याची इमेज बदलण्याचा प्रयत्न 'आह'मध्ये डॉक्टर चा गुडी गुडी रोल देऊन केला होता. पण आह पडला व प्राणचा चांगले रोल करायचा प्रयत्नही फसला.

नंतरच्या काळात राजेंद्र कुमार, विश्वजित, जितेंद्र, धर्मेंद्र, मनोज कुमार, शम्मी कपूर, शशी कपूर यांच्या प्रेमात काटे घालण्याचे काम प्राणने इमाने ऐतबारे केले. त्या काळात प्राणच्या भूमिकांमध्येदेखील वैविध्य असायचे. नव्हे तर प्राण जाणीवपूर्वक ते आणण्याचा प्रयत्न करायचा. संपर्कात येणाऱ्या माणसाच्या वागण्याचा, बोलण्याचा, देहबोलीचा बारकाईने अभ्यास करायचा. मग ते character लक्षात ठेऊन चित्रपटात एखाद्या भूमिकेमध्ये त्याचा चपखलपणे वापर करायचा. मेकअप मध्ये देखील कधी दाढीचे वेगवेगळे प्रकार तर कधी मिश्यांचे विविध अवतार, तर कधी डोक्यावर केसांचे अनेक प्रकारचे विग्ज याचा उपयोग केल्यानेच प्राणचा नेमका एकच चेहरा आपल्या डोळ्यासमोर येत नाही. जिस देशमे... मधला राका, उपकार मधला मलंग चाचा, जंजीर मधला शेरखान, बॉबीतला हाय सोसायटी मध्ये वावरणारा ऋषी कपूरचा बाप अशी प्राणची विविध रूपे आपल्याला दिसतात. काही वेळा विविध मासिकांमधले दाढी, मिशी, विग असे गेट-अप असलेले फोटो तो कट करून ठेवायचा व त्याचाही योग्यवेळी वापर करायचा.

जेव्हा-केव्हा एखाद्या चित्रपटासाठी प्राण भूमिका साईन करायचा तेव्हा त्या भूमिकेत वेगळे काय करता येईल याचा आधी विचार करायचा. मग मेकअपमन पंढरी दादा जूकर व विग मेकर कबीर यांना बोलावणे जायचे. प्राणच्या डोक्यातील कल्पना त्यांच्या समोर मांडली  जायची. कधी कधी त्या भूमिकेचे sketches काढले जायचे, मग जन्माला यायची प्रत्येक सिनेमासाठी वेगवेगळी characters. खानदान मधील त्याचा वेश हा हिटलरच्या मिशा आणि हेयर स्टाईल सारखा होता . तर अमर अकबर अंथोनी मधला अब्राहम लिंकन सारखा, जुगनू मध्ये त्यांनी मुजिबुर रेहमान सारखी मिशी, कुर्ता, चष्मा वापरला होता. तर निगाहे मधील दाढी sam pitroda सारखी ठेवली होती.

वेशभूषे बरोबर त्याच्या लकबीही वाखाणण्या जोग्या असायच्या. दिल तेरा दिवाना मध्ये विडी ओठांच्या डावीकडून उजवीकडे फिरवत संवाद बोलण्याची, मर्यादा मध्ये पेटती सिगारेट जिभेच्या सहाय्याने उलटी करून परत बाहेर काढण्याची, कब, क्यू और कहा? त नाणे उडवून उलट्या हातावर झेलण्याची तर मजबूर मध्ये अंगठा आणि बाकीच्या बोटांची वर्तुळ करून माणसे हेरण्याची लकब, या लकबी त्याच्या भूमिकेत चार्म निर्माण करायच्या. बडी बहेन मध्ये त्याचा प्रवेश हा असाच सिगारेट ओढत ओठांच्या चंबू करून त्याची वर्तुळ करून फेकण्यात (Rings) व्हायचा. त्या रिंग्स दिसल्या कि समजायचे की 'हा आला' म्हणून.

जवळ पास २० वर्ष खलनायकाच्या वेगवेगळया व्यक्तिरेखा साकार केल्यानंतर १९६७ मधे प्राणच्या कलाजीवनाला कलाटणी देणारा 'उपकार' आला. यात त्याने एक पाय गमावलेल्या मलंग चाचाचा रोल केला होता पण आपली इमेज बदलण्याचा प्राणचा हा पहिलाच प्रयत्न नव्हता. ५३ साली आह आपटल्यावर ६५ मधे मनोज कुमार च्या शहीद मधील केहार सिंगची भूमिका गाजली. त्यावेळचे पंतप्रधान लालबहादूर शास्त्री यांनी शहीदचे कौतुक केले. आपल्या जय जवान जय किसान या घोषणे वर एखादा चित्रपट बनवण्याची विनंती मनोज कुमारला केली आणि उपकारचा जन्म झाला. उपकार मध्ये प्राण वर 'कस्मे वादे प्यार वफा सब बाते है बातो का क्या' हे गाणेही चित्रित झाले. (हे गाणे गायला किशोर कुमारने नकार दिल्यानंतर मग कल्याणजी आनंदजी यांनी मन्नाडे कडून गाऊन घेतले). उपकारने प्राणची इमेजच बदलून टाकली. २० वर्ष लफंगा, हलकट, बदत्तमीज, हरामी अशी प्रेक्षकांची विशेषणे झेलणाऱ्या प्राणवर कौतुकाचा वर्षाव व्हायला लागला. आणि मग सुरु झाली प्राण ची हिंदी चित्रपट सृष्टीतील Second Inning!

उपकार नंतर प्राण चरित्र अभिनेत्याच्या भूमिकेत दिसायला लागला. प्रेक्षकही त्याच्या या नव्या भूमिकांना प्रतिसाद देऊ लागले. २० वर्ष खलनायकाच्या भूमिकेतून लोकांच्या मनात कायम तिरस्कार निर्माण करणारा प्राण आपली ती इमेज पुसून टाकण्यात पुरा यशस्वी ठरला. एक काळ असा होता की प्राणच्या नुसत्या एन्ट्री वर बाय-बापड्या त्याच्या नावाने कडकडा बोटे मोडायच्या, त्याला शिव्यांच्या लाखोल्या वाहायच्या. तोच प्राण आता लोकांच्या गळयातला ताईत बनायला लागला होता. त्यांच्या या दोन्ही इमेजचा सुरेख वापर हृषीकेश मुखर्जी यांनी गुड्डी मध्ये केलाय. एक प्रसंगात प्राण धर्मेंद्रला आवडलेलं घड्याळ देऊ करतो तेव्हा तिथे शूटिंग बघायला आलेली गुड्डी धर्मेंद्रला हळूच म्हणते की घेऊ नका ते घड्याळ त्यांच्याकडून, ते देण्यामागे जरूर त्यांच्या मनात काहीतरी वाईट हेतू असेल. त्यावर धर्मेन्द्र तिला सांगतो, प्राण सारखा चांगला माणूस या फिल्म इंडस्ट्री मध्ये शोधूनही सापडणार नाही. पण त्यांच्या सारख्या चांगल्या माणसाला वाईट माणसाच्या भूमिका कराव्या लागतात.

उपकार नंतरही प्राण आदमी, ब्रह्मचारी, तुमसे अच्छा कौन है, हमजोली, प्यार ही प्यार, कब क्यू और कहां, गवांर, आन बान, रूप तेरा मस्ताना या चित्रपटात खलनायक म्हणून चमकला पण नंतर चरित्र नायकाच्या भूमिकेतच राहिला. त्यातच भर पडली प्राणचे प्रत्येक चित्रपटात एखादे गाणे असण्याची. उपकार मधले कस्मे वादे हिट झाले होतेच. जंजीर मधले शेरखानचे यारी है इमान मेरा हेही हिट झाले. चित्रपट वितरकांचा निर्मात्यांवर प्राणवर चित्रित झालेले एखादे गाणे हवेच असा दबाव वाढायला लागला. वास्तविक प्राणला पडद्यावर गाणे गायचा जाम तिटकारा, पण व्यावसायिकतेच्या गणितांमध्ये त्यांना हा दबाव स्वीकारावा लागला आणि मग सुरु झाली प्राणच्या चित्रपट गीतांची रांग. मजबूर मध्ये 'आ गोयचो सायबा, विक्टोरिया २०३ मधे दो बिचारे बिना सहारे, धर्मा मध्ये राझ की बात कह दु तो जाने मैफिल मी फिर क्या हो, बेईमान मधील न इज्जत की चिंता, कसौटी मधील हम बोलेगा तो बोलोगे की बोलता है, या सर्व प्राण वर चित्रित झालेल्या गाण्यांनी प्राणला एका वेगळयाच लोकप्रियतेच्या शिखरावर नेले.

गाण्याबरोबरच प्राण विनोदी भूमिकेत देखील धमाल उडवून गेला. या विनोदी भूमिकांची सुरुवात झाली ती दादामूनी अशोक कुमार यांच्या बरोबरच्या विक्टोरिया नं २०३ ने. यात या दोघांनी राजा और राणा या भूमिकांमध्ये जी बहर उडवून दिली, की पुढे या दुकलीला घेऊन चोरी मेरा काम, चोर के घर चोर, राजा और राणा असे धमाल विनोदी चित्रपटच निघाले. प्राण ने आप के दिवाने, जंगल मे मंगल (दुहेरी भूमिका )यात देखील विनोदी भूमिका खुबीने रंगवल्या. सत्तरच्या दशकात प्राणपेक्षा जास्त मानधन घेणारा फक्त एकच कलाकार होता तो म्हणजे राजेश खन्ना. पण या दोघांनी त्याकाळात मर्यादा वगळता एकत्र काम केलेच नाही (नंतर सौतन, बेवफाई मध्ये एकत्र आले) राजेश खन्नाचे म्हणणे असे होते की माझे चित्रपट यशस्वी करायला प्राण सारख्या व्हिलनची आणि मेहमूदच्या कॉमेडी ची गरजच नाही. (त्याकाळच्या कुठलाही चित्रपट या दोघांशिवाय पूर्ण व्हायचा नाही) राजेशने एक प्रकारे प्राणला दिलेली ही compliment च होती. सत्तर - ऐंशीच्या दशकात बॉबी, जुगनू, धर्मा, जोशीला, कसौटी, संन्यासी, दस नंबरी, विश्वनाथ, दोस्ताना, कर्ज, कालीया, नसीब, अमर अकबर अंथोनी, सौतन, सनम बेवफा या चित्रपटात प्राण चरित्र अभिनेत्याच्या भूमिकेत अवतरला.

प्राणच्या अनेक चित्रपटांची जर श्रेयनामावली बघितली तर सुरुवातीचे नायक, नायिका, व प्रमुख कलाकारांचे नाव आल्यानंतर प्राणचे नाव येई. ते देखील AND PRAN असे. एकदा एका एका चाहत्याने त्यांना विचारले होते की तुमचे नाव नुसते प्राण आहे का AND PRAN आहे? ते स्वतःचे सिनेमे फार क्वचितच बघत असत. जंजीर जवळपास वीस वर्षानंतर त्यांनी बघितला व अमिताभला फोन करून सांगितले की मला तुझे जंजीर मधले काम आवडले म्हणून. वीस वर्षानंतर का होईना प्राण साहेबांकडून आलेली ही प्रतिक्रिया अमिताभला सुखावून गेली.

चित्रपटा व्यतिरिक्त त्यांना उर्दू शेरोशायरीचीही आवड होती. फुटबॉल, हॉकी, क्रिकेट या खेळावरही प्रेम होते. १९५० च्या सुमारास त्यांनी एक फुटबाल टीमही काढली होती. कपिल देव जेव्हा उगवता क्रिकेटपटु म्हणून उदयास येत होता तेव्हा BCCI ने त्याला ऑस्ट्रेलियाला ट्रेनिंग साठी पाठवायचे ठरवले. पण कोणी स्पोन्सोर मिळेना. (तेव्हा BCCI ची ही परिस्थिती होती!) प्राणला हे समजताच त्यांनी स्वतः कपिलचा ट्रेनिंगचा खर्च उचलण्याची तयारी दर्शवली होती. सर फ्रांक वॉरेल प्राणचे चांगले मित्र होते. जेव्हा जेव्हा ते भारतात यायचे तेव्हा मुंबईत प्राणला भेटल्याशिवाय जायचे नाहीत. १९७९ साली आसिफ इक्बालच्या नेतृत्वाखाली पाकिस्तानची टीम भारतात आली तेव्हा सिकंदर बख्तच्या भेदक गोलंदाजी मुळे दिल्ली कसोटीत भारत पराभवाच्या छायेत होता पण दिलीप वेंगसरकरच्या शतकाने भारताला सामना अनिर्णीत ठेवण्यात यश मिळाले. त्यावेळी प्राणने खुश होऊन भारतीय संघाच्या सर्व खेळाडूंचा गोल्ड मेडल देऊन सत्कार केला होता व सिकंदर बख्तलाही तो मेडल द्यायला विसरला नाही .

प्राणला उपकारने पहिले Best Supporting Actor चे फिल्मफेयर अवार्ड मिळवून दिले. दुसरे 'आंसू बन गये फुल' ने (आपल्या अश्रूंची झाली फुले या नाटकावर आधारित) व तिसरे बेइमान मधील पोलिस हवालदाराच्या भूमिकेने मिळवून दिले पण ते स्वीकारण्यास मात्र त्यांनी नकार दिला. त्याचे कारण होते त्या वर्षीचे सर्वोत्कृष्ट संगीतकाराचे पारितोषिक बेइमानसाठी शंकर जयकिशन यांना जाहीर झाले होते. प्राणचे म्हणणे असे की हे अवार्ड पाकीझासाठी गुलाम मोहम्मदला मिळायला हवे होते. आपल्या याच भूमिकेवर ठाम राहत प्राणने अवार्ड स्वीकारण्यास असमर्थता व्यक्त केली होती. (प्राणचा निर्णय किती योग्य होता. आजही पाकीझाची गाणी आपण आवडीने ऐकतो. ती आपल्या स्मरणात आहेत. बेईमानचे एकतरी गाणे तुम्हाला आठवते का ?)

रूढार्थाने प्राणला चित्रपटसृष्टीत प्रवेश करण्यासाठी संघर्ष करावा लागला नाही पण व्हिलन म्हणून आपले स्वतंत्र स्थान निर्माण करण्यात आणि ते टिकवण्यासाठी त्यांनी अपरंपार कष्ट घेतले. उपकार मधून प्राणने हेच सिद्ध केले की खलनायकाला कायम त्याच प्रकारच्या नकारात्मक भूमिका करत रहायची गरज नाही. जर त्याच्यात क्षमता व आत्मविश्वास असेल तर त्या चाकोरीबद्द भूमिकेतून बाहेर पडून तो नायक-चरित्र नायकाच्या भूमिकाही यशस्वीपणे साकार करू शकतो. प्राणने ही वाट तयार केली व नंतर त्याच वाटेवर खलनायक म्हणून कारकीर्द सुरु केलेले शत्रुघ्न सिन्हा, विनोद खन्ना चालत गेले. पुढे यशस्वी नायकही झाले .

हिंदी चित्रपट सृष्टीचा एव्हढा पगडा भारतीय जनमानसावर आहे की मुल जन्मले की त्याचे नामकरण एकतर देवादिकांच्या नावे केले जाते नाहीतर त्याकाळातील लोकप्रिय किंवा आवडत्या चित्रपट अभिनेत्याच्या नावाने. पूर्वीच्या काळी राज, दिलीप, राजेंद्र, मनोज अशी मुलांची नावं ठेवली जायची. त्यानंतर पिढी बदलली व राजेश, अमित, शशी, विनोद, सुनील ही नावं ठेवली गेली. आजची पिढी संजय, ह्रितिक, अभिषेक, सचिन अशी नावे ठेवते. काळ बदलला पिढ्या बदलल्या पण नावे ठेवायचा हा सिलसिला कायम आहे. फक्त दोनच नावं या आधीच्या पिढ्यांनी आपल्या मुलांची कधीच ठेवली नाहीत. एक म्हणजे रावण आणि दुसरे प्राण!!! एक इतिहासात बदनाम झालेले आणि दुसरे खलनायकाच्या भूमिका करून वर्तमानात बदनाम झालेले. प्राण हे नाव आजपर्यंत कोणी ठेवल्याचे ऐकिवात नाही. माझ्या मुलाचे नाव प्राण ठेवल्याचा पेढा मी तरी आजपर्यंत कधी खाल्ला नाही.

हेच प्राण या अभिनेत्याचे यश आहे. उणीपुरी सहा दशक हा माणूस यशस्वी जीवन जगला. अनेक प्रकारच्या विविधरंगी भूमिका केल्या. मान-सन्मान मिळवले. चांगला माणूस म्हणून फिल्म इंडस्ट्रीमध्ये नाव कमावलं. हस्ते परहस्ते गरजूंना मदत केली. मुलांना उच्च शिक्षण दिले, एकसे एक गाड्यांचा शौक केला. बंगल्यात एकाच वेळी ५-६ जातीचे कुत्रे पाळण्याचाही शौक पुरा केला. पत्ते, क्रिकेट, फुटबाल, हॉकी याचा भरपूर आनंद लुटला. उत्तोमोत्तम ड्रिंक्सचा आस्वाद घेत जीवन जगला. वयाच्या नव्वदी पर्यंत कृतार्थ आयुष्य जगला. माणसाला आणखी काय हवे असते आयुष्यात? या जगात येताना कोणाचा तरी 'दुवा' बनून येतो आणि जाताना लाखो, करोडो चाहत्याचा दुआ घेऊन जातो. यापेक्षा कृतार्थ जीवन काय हवे? या सिनेसृष्टीत नायक म्हणून अनेकांनी स्वतः ला मिरवले. पण खलनायक म्हणून अभिमानाने स्वतः ला मिरवणारा प्राणच!

भारतीय सिनेसृष्टीचे शताब्दी वर्ष साजरे होत असताना प्राणसारख्या बुजुर्ग अभिनेत्याचे जाणे ही गम कि की बात सहीच पण त्याहीपेक्षा वाईट या गोष्टीचे वाटते की यानंतर कुठल्याही नवीन चित्रपटाच्या श्रेय नामावलीत AND PRAN ही आद्याक्षरे यापुढे कधीही दिसणार नाहीत.

प्रशांत कुलकर्णी.

"coolkarnipr@gmail.com"

# विज्ञान-तंत्रज्ञानाच्या बुरख्याखालील
# दिखाऊ सुरक्षा व्यवस्था

एका पंचतारांकित हॉटेलमध्ये पाहुण्यांना भेटायला जाण्याचा योग नुकताच आला. हॉटेलच्या भव्य प्रवेशद्वाराशी माझी गाडी अडवून तिच्याखाली मागून एका चाकावर लावलेला आरसा दांडयाच्या आधाराने फिरवला गेला, डिकी उघडून पुन्हा लावली गेली आणि पुढे जाण्यासाठी गाडीवर थाप पडली. मी मागे वळून भोळसट भाव चेह-यावर आणून विचारले, “काय पाहिलेस रे?”, “साब, बॉम्ब फिट किया है क्या देखनेकी आर्डर है”. मी पुन्हा प्रश्न विचारला, “बॉम्ब कसा असतो रे”? सुरक्षा कर्मचारी ओशाळं हसला आणि मला ‘पुढे जा’ म्हणाला तोवर माझ्या मागची वाहनं हॉर्न वाजवायला लागली होती. बॉम्बच लावून मला माझं वाहन आत न्यायचं असेल तर तो मी गाडीच्या मागेच लावला पाहिजे असं काही असतं का? अर्थात तेही मला माहीत नाहीये कारण मी दहशतवादी नाहीये. पण अशा प्रकारच्या तपासण्या आजकाल जागोजाग केल्या जातात. ’भाबड्या’ दशहतवाद्यांना वाटावं की आपला इथे काही पाड लागणार नाही असा हेतू असतो की काय न कळे!

स्थळ विमानतळ. इथे तर अनेक सुरक्षा ’सर्कशीतून’ जावे लागते. इतर प्रवासात प्रवाशांची एवढी ’सुरक्षा चंगळ’ केली जात नाही. विमान प्रवास करणारे सगळेच व्हीआयपी असतात असे अजूनही यंत्रणांना वाटते की काय न कळे. तरी शशी थरूरनी सांगून झालंय की इथेही ’कॅटल क्लास’ असतो ते. असो. पहिला मुजरा घडतो तो वाहनातून विमानतळावर शिरण्याअगोदरच. आडव्या तिडव्या लावलेल्या बॅरिकेड्समधून वाहनाचा वेग कमी करत ते पुढे काढावे लागते. पुढे लगेचच एक सुरक्षा आधिकारी असतो. वाहनाची काच ड्रायव्हरने किंचीतशीच खाली केली की तो आत एक दृष्टिक्षेप टाकून लगेच पुढे जायची खूण करतो आणि आता येथपासून आपण खूपच सुरक्षित आहोत अशी समजूत करुन घ्यायला हरकत नसते.

नुकत्याच माझ्या वाचनात आलेल्या विमान प्रवास सुरक्षेवरील डेव्हिड पग यांच्या एका लेखात (साइंटिफिक अमेरिकन, जुलै २०१२) त्यांनी विमान प्रवासावेळी घेतल्या जाणा-या सुरक्षिततेबाबतची खिल्ली उडवली आहे. त्यांचं तंत्रज्ञानावर विविध नियतकालिकांमधून स्तंभलेखन चालू असतं. ते सदर लेखात म्हणतात, “हे कालबाह्य नियम विमान प्रवास सुरक्षित करण्यात मदत तर करीत नाहीतच पण त्याची परिणती विमानतळांवर मोठमोठ्या रांगा लागण्यात होतेय”. ११ सप्टेंबर २००१च्या अतिरेक्यांच्या हल्ल्यानंतर जनजीवनावर फार मोठे परिणाम झाले - विशेषतः विमान प्रवासावर. त्या दिवसापासून अमेरिकन सरकारने कोट्यावधी डॉलर्स खर्च केले, नव्या नियमांचा अंतर्भाव केला आणि विमानप्रवासच कोलमडवून टाकला म्हणा ना! हे कायदे/ नियम विज्ञान आणि कारणमीमांसेवर अवलंबून असते तर टीकाकारांनी याला 'सुरक्षिततेचे नाटक' असे नांव दिले नसतं. या नाटकाच्या अंकांमध्ये प्रवाशांना आम्ही सुरक्षिततेसाठी काहीतरी करीत आहोत हे पटवण्याचाच जास्त दिखाऊपणा दिसून येतो. पग उदाहरणादाखल इलेक्ट्रॉनिक उपकरणांविषयी लिहितात. त्यांचं लिखाण मुख्यत्वेकरून जेव्हा आपण ‘सुरक्षा तपासणी’ च्या दरवाज्यावर पोहोचतो तिथलं आहे. (या नावावरून असं समजायला हरकत नाही की आतापावेतो आपण सुरक्षित आहोत हा आपला भ्रम होता किंवा यंत्रणेला आपल्या सुरक्षेविषयी काही पडलं नाहीये. त्यांना त्यांच्या विमान, विमानतळ, वगैरे मालमत्तेची काळजी आपल्यापेक्षा सुरक्षेपेक्षा जास्त आहे आणि आपण दहशतवाद्यांपैकी एक आहोत की काय म्हणून आपली तपासणी होत आहे)

सामानाच्या स्क्रीनिंगच्यावेळी लॅपटॉप बॅगेतून काढून प्लास्टिक ट्रे मध्ये उताणाच ठेवला पाहिजे या वेडगळ नियमावर पग बोट ठेवतात. हा नियम फक्त लॅपटॉपनाच लागू होतो. टॅबलेट संगणक, फोन्स, इलेक्ट्रॉनिक खेळण्यांचे मॉनिटर्स, कॅमेरे मात्र यातून वगळले आहेत. असं का बरं? तर म्हणे लॅपटॉपसारखी मोठी उपकरणं बॅगेतील सामानाचे एक्स-रे करताना अडथळे आणतात! त्या नियमातही गंमत आहे. ११ इंची लॅपटॉप बॅगेतून काढला नाही तरी चालतो पण १३ इंची लॅपटॉप मात्र काढावा लागतो! अर्थात ही परिस्थिती अमेरिकेतली आहे. भारतात मात्र सरधोपट सगळयांनाच सगळयाच प्रकारचे लॅपटॉप बाहेर काढून ट्रेमध्ये ठेवावे लागतात हा भाग वेगळा. आम्ही पाश्चात्यांचं अनुकरण करण्यात एक पाऊल पुढे असतो ना!

अमेरिकेत विमानतळाच्या इमारतीत शिरण्यापूर्वी मेटल डिटेक्टरच्या चौकटीतून जे आतापावेतो जावे लागे त्याची जागा आता सूक्ष्मतरंग लहरींमधून जायची उपकरणं घेत आहेत. याचा उद्देश तस्करीचा माल आणि धातूपासून न बनलेल्या शस्त्रास्त्रांचा शोध घेण्यासाठी होतो. पण प्रवासी हे यंत्र त्यांच्या व्यक्तिगत स्वातंत्र्यावर घाला आणणारे (सुरक्षेचे अधिकारी त्यांच्या स्क्रीनवर प्रवाशांना नग्न बघू शकतात म्हणून), कर्करोगास निमंत्रण देणारे आणि महागडे (प्रत्येक मशीनची किंमत सुमारे ९० लाख रुपये) आहेत म्हणून त्याचा निषेध करतात. शिवाय हे उपकरण वापरायला दुप्पट कर्मचारी, प्रवाशांना करावी लागणारी पूर्वतयारी (खिशातल्या सगळया जिनसा काढून ठेवाव्या लागतात - अगदी पैशाचे पाकिट आणि बोर्डिंग पासही) आणि नंतर स्कॅन या सगळयाला सुमारे एक मिनिट (म्हणजे मेटल डिटेक्टरपेक्षा ६० पट अधिक वेळ) लागतो. याचा परिणाम असा की ज्या ठिकाणी अशी मशीन्स बसवली आहेत तेथील विमानतळावर देशी उड्डाणांसाठीही प्रवाशांना दोन तास आधी बोलावलं जातं. या वेळात किती कोटी डॉलर्सची उत्पादन तूट होतेय याचा कोणी विचारच केला नाहीये असं पग महाशय म्हणतात!

लिझ स्कली नावाची आयरीश स्त्री सध्या भारतात भटकतेय आणि तिनं बरीचश्या गंमतशीर पाट्यांची छायाचित्रं तिच्या ब्लॉगवर (http://www.madamletmetellyouonething.com/) संकलीत केली आहेत. त्यातील असंच एक छायाचित्र विमानतळावरील सूचनेसंबंधी आहे. “सुरक्षेच्या तपासणीनंतर आपण आपलाच मोबाईल न्या” (जणू काही सुरक्षा अधिकारी असं सुचवतायत की इथं तुमचे मोबाईल असुरक्षित आहेत आणि त्याला ते जबाबदार नाहीत!)

पग त्यांच्या तंत्रज्ञानाच्या क्षेत्राबाहेर जाऊन इतरही काही हास्यास्पद नियमांची उदाहरणे देतात. १०० मिलीग्रॅम पेक्षा जास्त द्रव पदार्थ प्रवाशाला सोबत न्यायला बंदी आहे. पण गंमत म्हणजे जर बाटली १०० मिली ग्रॅम पेक्षा मोठी असेल आणि त्यातील बरेचसे पेय संपलेले असेल तरी ती न्यायला परवानगी नसते! मात्र १०० मिलीग्रॅम पेक्षा कमी पण एकापेक्षा जास्त बाटल्या भरून असे अनेक प्रवासी गट एकच पदार्थ तो नेऊ शकतात किंवा बाळाचे १०० ग्रॅम पेक्षा जास्त असे अन्न असेल (आणि तुमच्याबरोबर बाळ असेल) तरीही परवानगी आहे!

आणखी एका वेडगळ नियमाचे पालन काही वेळा करावं लागतं. गेल्या वर्षी युरोपला जाताना दुबईच्या विमानतळावर पायातले बूट काढून एक्स-रे स्कॅनर मधून तपासावे लागले. पण १२ वर्षापेक्षा कमी वय असलेल्या प्रवाशांना मात्र या तपासणीतून सूट दिली होती!

२६/११ नंतर मी एकदा असाच आंतरराष्ट्रीय विमानप्रवास करीत होतो. माझ्या बॅगेतून नेत असलेला नेलकटर मला सुरक्षिततेच्या कारणास्तव तपासणीवेळी टाकून द्यावा लागला. अनेक देशांतून एकत्र आलेले आम्ही असेच या सुरक्षिततेविषयी गप्पा मारत होतो. विनोदाने माझी एक सहाध्यायी म्हणाली की कदाचित पुढील प्रवासात तिची नखंही तपासली जातील आणि ती वाढलेली असल्यास प्रवासापूर्वी कापायला लावतील!

अशीच आणखी एक वेडगळ संकल्पना. विमानोड्डाणाच्या आणि उतरण्याच्या वेळी प्रवाशांनी त्यांच्याकडची इलेक्ट्रॉनिक उपकरणं अगदी हेडफोन्स, इ-बुक रीडर्सही बंद करण्याचा आग्रह. का तर म्हणे ही विमानाच्या नेव्हिगेशन मध्ये ती व्यत्यय आणतात. खरं पहाता यास ठोस शास्त्राधार नाहीये. तात्विक दृष्ट्या असे अनुमान केलं आहे की ही उपकरणं विमानाच्या इलेक्ट्रॉनिक्सवर परिणाम घडवून आणू शकतात पण आतापावेतो या कारणामुळे एकही अपघात झालेला नाहीये. म्हणजे विज्ञानाद्वारे पडताळणी न केलेल्या अशा अंधश्रद्धांद्वारे केलेला नियम प्रवाशांना वेठीस धरत असल्याचं दिसतं. भारतात मात्र गेल्या वर्षापासून या नियमात थोडी सूट देण्यात आल्याचे दिसतंय. विमान जमिनीला टेकल्याबरोबर आता मोबाईल चालू करण्याची परवानगी देण्यात येते कारण कदाचित आता प्रवाशांनीच हा नियम धाब्यावर बसवायला सुरुवात केली आहे!

सुमारे बारा वर्षांपूर्वी श्रीलंकेच्या प्रवास करायची संधी मिळाली होती. परतताना माझ्याबरोबरच्या एका सहाध्यायीने टॅक्सी ड्रायव्हरला विचारुन लंकेत मिळणारी रामबुटान नावाची फळं विकत घेतली. त्यावेळी एलटीटीईचा दहशतवाद जोरात होता. केसाळ आवरण असणा-या या फळाची चव बघायला आम्ही सगळेच उत्सुक होतो. टॅक्सीत आणि नंतर तिथल्या विमानतळावर इतक्या वेळा आमची आणि आमच्या सामानाची झडती झाली की ते फळ चाखायला वेळच मिळाला नव्हता. विमानात बसल्यावरच काय ती उसंत मिळाली मग माझ्या सहाध्यायीने तिच्या पर्समधील फळं कापायचा चाकू रामबुटान कापायला काढला. अनेकदा सामान एक्सरेतून गेलं, दोनदा झडती झाली आणि कुठेही आणि कुणालाही हा सापडला नव्हता! ‘वा रे सुरक्षा व्यवस्था’ असं एका बाजूला वाटलं आणि आता विमानात या बाईने हा चाकू काढला आहे तो कुणी बघीतला तर त्याचे परिणाम काय होतील या विचाराने मी मात्र सर्दच झालो.

२००९ मध्ये स्वाईन फ्लूच्या साथीने जोर धरला होता. भारतात येणा-या प्रवाशांना तो झाला आहे काय याची खात्री करून घेण्यासाठी आंतरराष्ट्रीय विमानतळांवर डॉक्टर्सची नियुक्ती केली गेली. अर्थात आमचं नेहमीच वरातीमागून घोडं असतं त्या पध्दतीनं. स्वाईन फ्लूचे किती तरी प्रवासी भारतात आले असण्याची शक्यता वर्तवल्यावर! किती रोगी या डॉक्टर्सना विमानतळांवर मिळाले याचा कुठे तपशील मिळत नाही. पण विमानतळावरील गर्दी वाढवायला मात्र हे एक निमित्त त्या दिवसात झालं असणार आहे.

तर असे हे दिखाऊपणाचे नमुने. अमेरिकेत उघडपणे निषेध करण्याचा स्वभाव असणा-या प्रवाशांच्या वैतागण्याची सुरक्षारक्षकांना कल्पना आहे. याचा कधी तरी स्फोट होईल याची त्यांना जाणीव आहे. म्हणूनच आता ते नवे स्कॅनर्स प्रवाशांचे नग्न चित्र स्क्रीनवर पाठवले जात नाही तर यंत्रच त्याचे पृथक्करण करतात असे पटवून सांगत आहेत. काही विमानतळांवर ज्यांच्याबाबत फारशी शंका नाही अशा प्रवाशांची वेगळी रांग लावून त्यांचे कोट, बूट न काढता तपासणी केली जात आहे. तरी असे नियम फक्त विमान प्रवासासाठीच का? रेल्वे प्रवासासाठी का नाहीत (तेथे खरे पहाता प्रवाशांची संख्या शेकड्यांनी जास्त असते) असा प्रश्न पग महाशयांना पडतो हे सहाजिकच आहे. हे नियम निष्पापांना अतिरेक्यांपासून कितपत संरक्षण देऊ शकतात हा प्रश्नच आहे पण वैतागवाणे मात्र ठरतात हे मात्र नक्की.

विमानतळाच्या प्रवेशद्वारात विमानप्रवासात बरोबर कुठल्या-कुठल्या वस्तू वर्ज्य आहेत याची एक चित्ररुपात यादी आणि प्रत्येक वस्तूच्या चित्रावर लाल फुली मारलेली असते. या यादीत आपली अक्कलही (common sense) प्रवाशांनी बरोबर नेऊ नये याचा अंतर्भाव करावा आणि 'आल्या नियमास असावे सादर' याची प्रवाशांनी तयारी ठेवावी असं पग सुचवतात.

मुरारी तपस्वी tapaswimurari@gmail.com

# श्री. विजय पांढरे यांच्या खुल्या पत्रास उत्तर

मा.संपादक इत्यर्थ व विजय पांढरेसाहेब ,

आताच मी इत्यर्थच्या ऑक्टोबर २०१२ च्या (वर्ष पहिले अंक ५वा) अंकातील श्री. विजय पांढरे ह्यांनी सर्व अभियंत्यांना संबोधित केलेले अनावृत्त (खुले) पत्र वाचले.

ह्याचा मला आलेला एक अतिशय कटू अनुभव मी येथे देत आहे.

१९६३ मध्ये मी शासकीय दुग्ध शाळा विकास योजनेतील कृषी बांधकाम विभागात कनिष्ठ अभियंता ह्या पदावर नाशिक येथे रुजू झालो. १९७० मध्ये माझी ठाणे जिल्ह्यातील तलासरी जवळच्या दापचरी दुग्ध प्रकल्पावर बदली झाली.

दापचरीस आल्यावर माझी नियुक्ती मातीचे धरण सबडिव्हिजन मध्ये झाली होती. हे मातीच्या धरणाचे काम मुंबईच्या ९०% टॅक्सी ज्यांच्या मालकीच्या होत्या आशा एका महाधनाढ्य सरदारजींना मिळालेले होते व त्यांचा प्रतिनिधी म्हणून रशीद नांवाचा एक रेसिडेंट इंजिनीअर काम पहात असे.

मी कामावर रुजू झालो त्यावेळी कट-ऑफ ट्रेंचच्या मातीच्या भरावाचे काम जोरात चालू होते. बॉरो एरियातून अनेक डंपर माती आणत व जमिनीवर पसरत असत. तांत्रिक स्पेकिफिकेशनप्रमाणे एका वेळी ९" पेक्षा जास्त जाडीचा थर करू नये.९" जाडीचा भराव करत असताना सुद्धा त्यावर टँकरने सतत पाणी मारत राहून व १० टनाचा रोड रोलर व शिप फुट रोलर फिरवून भरावाचे मधून मधून टेस्टिंग करून ते ९५% प्रॉक्टर डेन्सिटी येईपर्यंत भराव कॉम्पॅक्ट करावयाचा असतो व ते आल्यावरच दुस-या थरास सुरुवात करायची असते.

मला मात्र पाहिल्याच दिवशी तेथे असे आढळून आले की येथे टेक्नीकल स्पेसिफिकेशन्स पुर्णपणे गुंडाळून ठेऊन मनमानी करून सर्रासपणे १.५' ते २' जाडीचा भराव कोणतेही रोलिंग न करता टाकण्यात येत होता व नंतर त्या २' जाडीच्या भरावावर एखादा टँकर पाणी टाकून व नावापुरता ५-७ मिनिटे रोलर फिरवून झाला की पुन्हा दुस-या थराचा भराव टाकण्यास सुरुवात करण्यात येत होती. हे सर्व कामावर देखरेखीसाठी सरकारने पगार देऊन ठेवलेले माझे इतर सहकारी इंजिनीअर उघड्या डोळ्यांनी कोणताही विरोध न करता निमूटपणे पहात होते.

माझ्या स्वभावाला हे कदापि पटणारे नसल्याने मी ताबडतोब अशा प्रकारे भराव करण्यास आक्षेप घेऊन काम थांबवले.

डंपरच्या ड्रायव्हर्सनी ही गोष्ट ठेकेदाराचे कामावर असलेल्या इंजिनियर्सच्या कानावर घातली. त्यांचेतील एक सिनियर इंजिनीअर माझ्याकडे आला व मला बाजूला घेऊन समजुतीच्या स्वरात मला म्हणाला “साहेब कशाला निष्कारण चालत्या गाड्याला खीळ घालायचा प्रयत्न करता आहात? पावसाळयास आता फक्त १.५ महिनाच बाकी आहे व त्यापूर्वी हा भराव आत्तापेक्षा ९ मीटर उंच उचलणे भाग आहे व म्हणूनच आम्ही अतिशय जोरात सुरू केलेले हे भरावाचे काम तुम्ही असा अडथळा आणून बंद करू लागलात तर वेळेत कसे पूर्ण होणार? तुमच्या काही ‘अपेक्षा ’ असतील तर तुम्ही त्यासाठी संध्याकाळी आमचे रेसिडेंट इंजिनीअर श्री. रशीदसाहेबांना भेटा. आम्ही त्यांना सांगू. ते तुमची नाराजी दूर करून तुम्हाला एकदम खुष करून टाकतील पण मी त्यांना निक्षून सांगितले की मला कुणाला भेटायची काय जरूरी आहे? मी अजिबात नाराज नाही. पण जर तुम्ही टेक्नीकल स्पेसिफिकेशन्स धाब्यावर बसवून आता चालू आहे त्याचप्रमाणे पुढे काम चालू केलेत तर ते मी कदापि होऊ देणार नाही हे पक्के लक्षात ठेवा. मी त्यांना न बधल्याने त्यांचा नाईलाज झाला व त्या दिवसाचे उर्वरित काम त्यांना नियमानुसारच करावे लागले.

माझ्या अंदाजाप्रमाणे त्या दिवशी संध्याकाळीच त्यांनी ही गोष्ट त्यांचे रेसिडेंट इंजिनीअर रशीद ह्याचे कानावर घातली असावी. कारण दुसरे दिवशी माझ्या धाकाने घाबरून भरावाचे काम अगदी काटेकोरपणे नियमानुसारच चालू होते. दुपारी १२ च्या सुमारास रेसिडेंट इंजिनीअर रशीद जीप घेऊन कामावर आले व त्यांनी मला साइट ऑफीसमध्ये येऊन भेटा असा निरोप पाठवला. त्यावर माझे त्यांच्याकडे काहीच काम नसल्याने व ते माझे वरिष्ठ अधिकारीही नाहीत किंवा मी त्यांचा नोकरही नाही त्यामुळे त्यांना भेटण्यास मी येत नाही असा उलट निरोप धाडला. त्यामुळे हे साधेसुधे प्रकरण नाही हे रशिदच्या लगेच लक्षात आले व थोड्याच वेळात तोच माझ्याकडे आला व मला दमात घेत एकेरीवर येत म्हणाला “तुझ्या सारखी गुरगुरणारी ५६ कुत्री मी आत्तापर्यंत पाहिली आहेत व त्यांना इतके सुतासारखे सरळ केलय की आता ती मी त्यांचेपुढे टाकत असलेल्या तुकड्यांसाठी आशाळभूत होऊन माझ्यापुढे लाळ घोटत असतात. तू तुझी किंमत बोल. मी वाटेल ती देईन. पण असे काम थांबवलेस तर तुला ते फारच महागात पडेल हे लक्षात ठेव.”

पण जेव्हा त्याच्या दमदाटीला किंवा धमक्यांनाही मी दाद देत नाही व मी फक्त नियमानुसारच काम करू देईन अन्यथा नाही हे त्यास समजले तेव्हा निराश होऊन तो कॅम्पवर परत गेला.

दुसरे दिवशी तो पुन्हा आला व मला धमकावून म्हणाला “इतर इंजिनियर्सना तो दर आठवड्याला फक्त दोनशे रुपये देतो पण तू जरा जादा शहाणपणा दाखवतो आहे म्हणून तुला मी दर महिन्याला मी तुला एक पाचशे रुपये देत जाईन,ब-या बोलाने, मी ते घेऊन त्याच्या कामात अडथळे आणू नयेत अन्यथा तो मला चुटकीसारखा त्याच्या साईटवरुन बाजूला करेल, पुढे त्याने फुशारकीने असेही सांगितले की तुझ्या अधिक्षक अभियंत्यांपासून ते खात्याच्या मंत्र्यांपर्यंत सर्व जण त्याच्या खिशात आहेत आणि येथे दापचरीस असणारी एकूण एक इंजिनीअर अधिकारी मंडळी म्हणजेच सर्व डेप्युटी व एक्झिक्युटिव्ह इंजिनियर्स हे तर लाचार असल्यासारखे दीनवाणे होऊन दर महिन्याचे पहिल्या आठवड्यात त्याच्या कॅंपवर येतात व भिका-यांप्रमाणे रांगेत उभे राहातात आणि कुत्र्याला पावाचा तुकडा टाकावा तसे मी त्यांच्या झोळीत टाकलेली नोटांची पुडकी घेऊन मला मानाचा मुजरा करून निमूटपणे निघून जातात. तू शहाणा असल्याने ह्याचा नक्की विचार करशील व वेळीच भानावर येऊन त्याने दिलेल्या ऑफरचा स्विकार करून स्वत:चे कल्याण करून घेशील.”

त्याचा हा सल्लाही मी ठोकरला व त्याला खडसावूनच सांगितले की, “मंत्र्यांपर्यंत सर्व जण त्याच्या खिशात असल्याने त्यांच्या मदतीने त्याने माझी डॅमचे साइटवरून उचलबांगडी करावीच” त्यामुळे हे पाणी काही औरच आहे ह्याची त्याला खात्री पटली व तो दुस-या तयारीला लागला.

त्यानंतर वेगाने चक्रे फिरली व लवकरच अधिक्षक अभियंता ह्यांचेकडून एक्झिक्युटिव्ह इंजिनियरना एक अर्जंट असा शिक्का असलेले पत्र आले व त्यात त्यांनी असे आदेश दिले होते की “पावसाळा आता तोंडावर आलेला असून तो प्रत्यक्ष सुरू होण्याचे आत मातीच्या भरावाचे काम पूर्ण होणे हे जवळ जवळ अशक्यप्राय असल्याने ते वेळेत उरकण्यासाठी हे पत्र मिळताच युद्धपातळीवर प्रयत्न करणे जरुरीचे असल्याने ताबडतोब दोन पाळयात कामास सुरुवात करावी.”

ह्या आदेशामागचे (पडद्यामागचे) खरे राज-कारण असे होते की, दोन पाळयात काम चालू केल्यावर ठरवून ठेवल्याप्रमाणे मला रात्रपाळीत टाकायचे म्हणजे दिवसा माझी पीडा रहाणार नाही व मी रात्रपाळीत गेल्यावर झोपून जाईन आणि तेव्हाही रशिदला विनासायास हवे तसे काम करता येईल.

ठरवल्याप्रमाणे दुसरेच दिवसापासून माझी रात्रपाळीत वर्णी लावण्यात आली, हुकूम हातात पडताच मी एक्झिक्युटिव्ह इंजिनियरांकडे गेलो व त्यांना सांगितले की मी रात्रपाळीत जायला तयार आहे, मात्र धरणाची साईट कॉलनीपासून ८ किलोमीटर दूर असल्याने कामावर जाण्यासाठी वाहनाची व्यवस्था करावी व रात्रपाळीत सुपरव्हिजन करताना नीट दिसावे म्हणून मला एक मोठा टॉर्च देण्यात यावा. माझ्या दोन्ही मागण्या ह्या सनदशीर व रास्त असल्याने त्यांना त्या नाकारता आल्या नाहीत म्हणून ते मला म्हणाले मी तुम्हाला थोड्या वेळाने कळवतो.

थोड्या वेळाने ते मला म्हणाले की रोज सध्याकाळी डॅमचे साईट वरुन एक डंपर लेबरना घेऊन कॉलनीत येताच असतो, त्यातून मी कामावर जावे व एक-दोन दिवसात एक नवा मोठा टॉर्च खरेदी करून मला देण्यात येईल.

पण तो डंपर ठेकेदाराचा असल्याने व त्याने देऊ केलेल्या ह्या मेहरबानीमुळे मला ऋणाईताला यावे तसे मिंधेपण येईल व मी त्या दाबाखाली कामात चोखपणा दाखवू शकणार नाही असे सांगून त्यांचा तो प्रस्ताव स्वीकारण्यास नकार दिला त्यामुळे अखेरीस नाइलाजाने त्यांना मला सरकारी जीप उपलब्ध करून द्यावी लागली.

दुसरे दिवशी सायंकाळी ७.३० वाजता मी व माझे दोन असिस्टंट एक मुकादम व एक कारकून असे आम्ही तिघे रात्रपाळीसाठी जीपने डॅम साइटवर पोहोचलो.

दिवसाप्रमाणेच रात्रीच्या किर्र अंधारातही मी कोणतीही कसूर न करता चोखपणे ड्यूटी करू लागलो व ठेकेदारास मनमानी प्रमाणे काम करू देण्यापासून रोखून धरले. दुसरे दिवशी मला एक मोठ्ठा नवा टॉर्चही इश्यू करण्यात आला. त्याचे उजेडात मी माती योग्य जाडीतच पसरली जात आहे ना ह्याची खात्री करूनच पुढच्या डंपरला माती खाली करण्यास संमती देत होतो.

डंपर ड्रायव्हरकडून हे सर्व नियमितपणे रशिदच्या कानावर जातच होते व त्यांचे मनमानीपणे काम करावयाचे मनसुबे माझ्या चोख व खंबीर वागण्याने धुळीस मिळाल्याने तो मनातून अतिशय खवळला होता.

अखेरीस एका रात्री त्याने सर्व डंपर ड्रायव्हर्सना सूचना दिल्या की तुम्ही त्या इंजिनियरकडे अजिबात लक्ष न देता नेहमीसारखे आणलेली माती खाली करणे चालू करा, जर त्या इंजिनियरने मध्ये येऊन तुम्हाला अडवले तर सरळ त्याच्या अंगावर डंपर खाली करा व त्याला मातीत गाडून टाका, काही झाले तरी मी भक्कमपणे तुमच्या पाठीशी आहे तेंव्हा त्याला बिलकुल घाबरू नका.

आणि दुस-याच रात्री डंपर ड्रायव्हर्सनी पूर्ववत मनमानी करण्यास सुरुवात केल्यावर ड्रायव्हरला डंपर खाली करण्यापासून रोखण्यासाठी मी डंपरच्या मागे जाऊन उभा राहिलो, तेव्हा ड्रायव्हर खाली उतरून माझेपाशी आला व म्हणाला साहेब कृपा करून तुम्हा बाजूला व्हा अन्यथा मी काहीही विचार न करता सरळ डंपर खाली करेन पण मी ऐकत नाही असे पाहून त्याने खरोखरच सरळ डंपर माझ्या अंगावरच खाली केला,त्या बरोबर एकदम जी माती माझ्यावर पडली त्याने माझा चष्मा उडून मातीत गेला, टॉर्च हातातून सुटली व तीही मातीत गेली माझ्या नाकातोंडात माती जाऊन खांद्यापर्यंत मी त्या मातीत गाडला गेलो,तिकडे बिलकुल लक्ष न देता ड्रायव्हर डंपर घेऊन निघूनही गेला. माझ्या सहकारी मुकादम व कारकून ह्यांनी मला बखोट्यास धरून मातीतून ओढून बाहेर काढले व सुरक्षित जागी नेऊन बसवले. चष्मा व टॉर्च तर शोधूनही मिळालीच नाही, मी मात्र जीवावरच्या प्रसंगातून केवळ नशीब बलवत्तर होते म्हणूनच बचावलो असे म्हणावयास हवे.

दुसरे दिवशी सकाळीच मी झाल्या प्रकाराचा सविस्तर अहवाल लिहून काढून त्याच्या १०-१५ प्रती काढून त्या डेप्युटी इंजिनीअर, एक्झिक्युटिव्ह इंजिनीअर,सुपरीनटेडिंग इंजिनीअर, डी.एस.पी, कलेक्टर, डेअरी कमिशनर, खात्याचे व मुख्यसेक्रेटरी, राज्यमंत्री व कॅबिनेट मंत्री अशा सर्वांना तर पाठवून दिल्याच पण तेवढ्यावर गप्प न बसता मी माझ्यावर गुदरलेल्या प्रसंगाचा सविस्तर वृत्तान्त मुंबईच्या प्रमुख वर्तमानपत्रांच्या संपादकांनाही पाठवला. इतकेच नाही तर आमच्याकडे असलेल्या पॉकेट बुक नांवाच्या अत्यंत महत्वाचा डॉक्युमेंटमध्ये झाल्या प्रकाराची सविस्तर नोंद केली. नियम क्र. २ नुसार ऑडिटचे वेळी नोटबुकातील आशा नोंदी तपासून त्याची दाखल घ्यावी असा कायदा आहे.

माझे पत्र मिळताच नेहमी अजगरासारखी सुस्त असणारी संपूर्ण सरकारी यंत्रणा एकदम शॉक बसल्यासारखी खडबडून जागी झाली.

रशीदने मुंबईस जाऊन बरीच धावपळ केली व पाण्यासारखा पैसा खर्च केला आणि प्रकरण दाबून टाकण्यात तो यशस्वी झाला. पैशापुढे अखेर सत्याची गळेचेपी झाली.

मुंबईहून रशीद दापचरीस परतला तो माझ्या बदलीची ऑर्डर घेऊनच.

कोणतेही सबळ कारण न देता माझी दोन महीने पूर्ण होण्याची आतच तेथल्या तेथेच इरिगेशन डिव्हिजनमधून बिल्डिंग सिव्हिल डिव्हिजनमध्ये बदली करण्यात आली.

एकूण काय तर अखेर भ्रष्टाचाराचाच विजय झाला व सत्याची गळचेपी झाली हाच कटू अनुभव मला आला.

प्रमोद तांबे

११ जुलै २०१३

"pltambe@yahoo.co.in"

# मांडवली

“हमारी युनियन, हमारी ताकद “

“जो हमसे टकरायेगा, मिट्टीमे मिल जायेगा ”

बाहेर घोषणाबाजीला जोर आला होता. मराठी माणसाचा कैवारी म्हणवणा-या युनियनच्या घोषणा मात्र हिंदीत होत्या, हे ऐकून तशाही परिस्थितीत मला हसू आलं.

“का रे, हसतोस का ? “मानेने विचारले.

“ऐक जरा, बाहेर काय ओरडतात ते, इकडे मराठी ऽ मराठी, म्हणून धोषा लावणा-यांचे पाठीराखे बाहेर हिंदीत बेंबीच्या देठापासून ओरडत आहेत.”

एव्हाना ओरडणा-यांचे म्होरके आत येऊन दाखल झाले होते. खादीचे पांढरे स्वच्छ स्टार्च केलेले पायजमे व झब्बे, पांढ-या चपला, प्रत्येकाने दाढी वाढवलेली, कपाळावर कुंकवाचा भला मोठा टिळा, गळयात जाड सोन्याचे साखळदंड व चेन, मनगटावर सोन्याच्या पटटयात लावलेले जाडजूड घड्याळ, दोन्ही हातात सोन्याची कडी, प्रत्येक बोटावर भली मोठी अंगठी, अशा “भाई” वेशात मुख्य नेता व त्याचे कार्यकर्ते कम् चमचे आत आले. त्यांच्या नजरेतील जरब व चेह्ऱ्यावरील मग्रूरिचे भाव ते काम ’गार’ नेते असल्याची खात्री देत होते. धाडदिशी केबिनचे दार ढकलून ते टोळकं आत घुसलं देखील.

“ह्ये बघा, आमच्यापाशी लै टाईम न्हाई. तुमचा कोन जो म्याणेजर असंल, त्याला लगीच हिथं बोलावून घ्या अन् ह्ये बघा, आम्हाला जास्त घोळ नको. आमच्या लोकांच्या रास्त मागन्या हाईत, त्या मान्य करा. न्हाईतर मग...”

बंगलोरच्या हेड ऑफिसमधून जेमतेम एक महिन्यापूर्वी जॉइन झालेले कोप्पीकर साहेब हा सगळा प्रकार बघून हादरलेच. गेला एक आठवडा रोजच्या रोज गेट मिटींग होत होत्या. इंटरनल युनियनचे लोक मागण्यांचे पत्रक देऊन गेले होते. पर्सनल मॅनेजर माने त्यांच्याशी बोलणे पण करत होता अन् अचानक हे बाहेरचे लोक कोण येऊन घुसले ?

“हा काय प्रकार आहे ? कोण तुम्ही ? तुम्हाला आत कोणी सोडलं ? सिक्युरीटी ऽऽऽ !” कोप्पीकर ओरडले.

"ह्येच ते कोप्पीकर साह्यब, जणरल म्यानेजर इथले. "बरोबरच्या एकाने माहिती पुरवली. "आंगाश्शी, बरच झाल ना मंग , ह्यो इथच गावला त्ये. काय बोलायचं ते आता यापुढं आमच्याशी बोलायचं, समजला का ?"

" भाऊ, अहो, तुम्ही उभे का, बसा ना." माने पुढे होऊन अदबीने त्या नेत्याला म्हणाला.

म्हणजे ही काय भानगड आहे ? हा माने ओळखतो की काय या भाई लोकांना, मला कळेना हा काय प्रकार आहे. मी नजरेनेच त्याला विचारलं, तर हा हळूच जवळ येऊन पुटपुटला, "सांगतो, थोड्या वेळाने,"

"भाई ,तुम्ही बोलताय ना ?" – माने

"हां, तर मग आमच्या मानसांनी तुम्हाला अगुदरच सांगीत्लं असल. यापुढं कंपणीत कोणती बी भरती असन तर आम्हाला ईश्वासात घेतल्या बिगर करायची नाही. आधी आमची पावती फाडायची मंग पुढच काम बघायचं. आल का तुमच्या टकुर्यात?" – भाईनी डायरेकट मुद्यालाच हात घातला.

"हे बघा, रिक्रूटमेंटच्या आमच्या पॉलिसीज या थेट कॉर्पोरेटकडून येतात. आम्ही त्यात काही बदल करू शकत नाही. माने, तुम्ही हे त्यांना समजवून सांगितले आहे ना ?"– कोप्पीकर.

"हो, सर, हो सर. मागच्या मिटींग मध्ये मी हेच सांगितलं, सर." – माने

"आमी बी ऐकलं की समदं पन येक ध्यानात ठिवा, तुम्हाला धंदा हितं करायचा हाय की नाही ते येक डाव पक्क ठर्वा. हितं करायचा असन तर, आमचा सबूत फायनल. इथल्या प्रत्येक घरटी एका मानसाला तुमच्या हितं नोकरी भेटलीच पाहिजे. अन् सामान उचलन्याच कंत्राटदार बी आमी सांगू त्येच राहतील. त्यांच्या रेटचं आमच्यावर सोडायचं. कसं ?" – भाई.

"अहो, पण हे कसं शक्य आहे ? त्यांना नोकरीवर ठेवायचं म्हणजे त्यांना काम यायला नको का ? इथे आम्ही इतका सॉफिसटीकेटेड म्हणजे अगदी स्टेट ऑफ द आर्ट प्लांट आणणार आहोत, तो चालवायला चांगली शिकलेली माणसं लागतील." – प्लानिंगच्या बेन्द्रेला मधे मधे बोलण्याची भारी सवय.

"हां ना ? मग त्यान्ला शिक्वा की, कोन नाई म्हनतो ? लागा आत्तापासून कामाला. त्यानला पगार बी द्या अन् समदं बेज्वार शिकवा. लै हुशार हैती आमची पोरं." – भाईशी बोलण इतकं सोप नाही हे आता सगळया स्टाफच्या लक्षात यायला लागलं होतं. इथे कामाला लागणाऱ्या प्रत्येक माणसाकडून भाईची माणसं पैसे वसूल करतात अन् त्यात म्हणे आपल्या इथल्याही कोणाचा तरी कट असतो असं कानावर येत होतं, त्याची चुणूक आता दिसायला लागली.

पण हे सगळं चालू असताना मानेचा खुललेला चेहरा काही तरी वेगळंच सांगत होता. काय कारण असेल बरं ?

“मंग ? त्ये समदं कसं फिक्स करायचं ते मानेसाहेब ठरवतील. झालं तर मग फायनल.” असे म्हणून आले तसे सगळे टोळके ‘ फायनल झाले ‘असे सांगून वावटळी सारखे निघून देखील गेले.

झाल्या प्रकाराने हादरलेले कोप्पीकर साहेब अजून पुरते सावरले नव्हते. त्यांनी मानेला थांबवून घेतले. हळू हळू बाकीचे आपापल्या कामाला लागले.

“माने, काय म्हणत होता तो भाई ?”– कोप्पीकर

“म्हणजे काय आहे ना सर, आपल्याला पण त्या लोकल लीडर लोकांशी जरा जुळवून घ्यावं लागेल.”

“अरे, पण या एवढ्या सगळ्या लोकांना पे रोलवर घेणं कसं शक्य आहे ? काहीतरी आपलं उगीच.”

“मी काय म्हणतो सर, मी जरा बोलून बघू का त्यांच्याशी ? काही तरी मार्ग नक्की निघेलच.”

“हे बघा, आपल्याला कार्पोरेट कडून अगदी क्लियर सुचना आल्या आहेत. एकही इंडायरेकट मॅन पॉवर मध्ये वाढ होऊन चालणार नाही.”

“हो ना सर, मी काय म्हणतो, आता जी लिस्ट आपण फिल्टर प्लांटसाठी फायनल करणार आहोत ना त्यात काही त्यांची माणसं ॲड केली तर ? म्हणजे तुमच्या परवानगीनेच हं सर,”- माने

“मग ठीक आहे , बघा कसे मॅनेज होते ते आणि शरद तू पण जरा मदत कर मानेंना “ – भांबावून कोप्पीकर मला म्हणाले.

“ते माझ्यावर लागलं सर, तुम्ही काही काळजी करू नका.” – माने.

त्या नंतर नेमकी काय चक्रं फिरली कोण जाणे. झटक्यात भरती सुरु झाली. लेखी, तोंडी, इंटरव्ह्यू सगळे सोपस्कार चालू झाले. मंजूर झालेल्या फिगरपेक्षा कितीतरी जास्त लोकांना जोईनिंग लेटर्स पण देऊन झाली. जमिनी घेताना बाधित झालेल्या लोकांच्या ओरीजिनल यादीमध्ये नवीन नावे घुसवण्यात आली अशा तक्रारी पेपर्स मध्ये यायला लागल्या. सगळीकडे गाजावाजा होऊ लागला अन् त्यात बातमी आली ‘हेड ऑफिस मधून इन्क्वायरी करायला लोक येणार’.

त्याप्रमाणे इन्क्वायरी झाली. कोप्पीकर साहेबांच्या सांगण्यानुसार व त्यांच्या परवानगीनेच आपण सर्व केले असा पवित्रा मानेने घेतला. या सगळ्या भानगडीत कोप्पीकर साहेबांचा बकरा बळी गेला.

काल तो भाई व माने एकामागे एक थोड्या थोड्या वेळाने हॉटेल गेटवे मधून बाहेर पडताना दिसले त्यामागे ही अशी एकंदरीत योजना होती तर! तरी म्हटलं, हा माने एकटा यावेळी इतक्या मोठ्या हॉटेल मध्ये काय करत होता. आता एकदम उलगडा झाला.

एका आठवड्याने फॅकटरीच्या रस्त्यावर भले मोठे पोस्टर लागले.

“भाई आगे बढो, हम तुम्हारे साथ है, चाकणचे तारणहार,

शहर अध्यक्षपदी तुमची नेमणूक झाल्याबद्दल तुमचे हार्दिक अभिनंदन !”

झुकून नमस्कार करतानाच्या पोज मधील भाईच्या कटआउटखाली बरेच फोटो होते, त्यात आमचे ‘प्रेरणा स्थान’ म्हणून ऐटबाज टोपी बिपी घातलेल्या फोटोमध्ये माने अगदी ओळखू येत नव्हता.

- अरुण लेले.

lele.arun@mungiindia.com

- एके काळी मुंबई-पुणेसारख्या शहरांत एकवटलेला मराठी वाचकवर्ग आता जगाच्या कानाकोपर्यात पोहोचला आहे. ई साहित्य प्रतिष्ठानच्या वाचकवर्गात जसा ओमान, नॉर्वे, कझाखस्थानचा मराठी तरूण वाचक आहे तसा महाराष्ट्रातल्या खेड्यापाड्यातलाही युवा वाचक आहे. मराठी पुस्तकांचं वितरण सर्वत्र शक्य होत नाही. पण स्मार्ट मोबाईल मात्र आता घरोघर पोचले आहेत. आणि त्यावर ई साहित्य प्रतिष्ठानची ई पुस्तकं वाचता येतात. वॉट्स ऍप आणि ब्ल्यु टुथ द्वारे ही पुस्तकं एकमेकांना फ़ुकट आणि सहज देता येतात. त्यामुळे अशा वाचकांची फ़ार मोठी सोय होत आहे. ई साहित्य प्रतिष्ठानची ईज्ञानेश्वरी आणि मोरया सारखी पुस्तकं दशलक्षावधी वाचकांपर्यंत पोहोचली. याचं कारण या माध्यमाची सहजता. ई माध्यमातून दर्जेदार सकस वाचनीय साहित्य नव्या पिढीला उपलब्ध करून देण्याचा एक महायज्ञच आम्ही उभारला आहे. आणि त्याला आपली साथ मिळाली तर यातून काही भव्य उभे राहील.
- ई साहित्य प्रतिष्ठानतर्फ़े नव्या तरूण वाचकांना व्यासपीठ मिळवून देण्याचा प्रयत्न आहे. त्याचबरोबर हे साहित्य केवळ मनोरंजनासाठी न रहाता त्यातून काही प्रबोधन, काही जागृती, काही सामाजिक चळवळ उभी रहावी. महाराष्ट्राच्या उदयाच्या प्रगतीत ई साहित्य प्रतिष्ठानचा खारीचा वाटा असावा. आणि ही प्रगती केवळ भौतिक नव्हे तर सर्वांगिण असावी. आत्मिक आणि वैचारिक असावी. म्हणून आम्ही ई पुस्तकाचा पर्याय निवडला. खेडोपाडी पोहोचेल. जगभर पोहोचेल. मुख्य म्हणजे ई पुस्तक हे "नैनं छिंदन्ति शस्त्राणि नैनं दहती पावकः" असे अविनाशी असल्यामुळे आपल्यानंतरच्या पन्नास पिढ्यांपर्यंत ते सुखरूप असणार याचाही विचार करावा. याच्या निर्मितीचा अत्यल्प खर्च आणि पर्यावरणाची हानी न होता त्याचा प्रसार हा व्यापक विचारही मनात धरावा. आणि या चळवळीला पाठिंबा म्हणून लेखकांनी आपली पुस्तकं वाचकांसाठी उपलब्ध करून द्यावीत. अर्थात विनामूल्य. ई साहित्य प्रतिष्ठान ना पैसे घेत ना देत.
- हे व्यासपीठ तरूण नवलेखकांसाठी तर स्वतःचेच मुक्तद्वार आहेच आहे. आपल्या लिखाणात कितपत दम आहे याचा लेखाजोखा घेण्यासाठी याहून अधिक चांगले माध्यमं नाही. कारण वाचकांच्या स्पष्ट प्रतिक्रिया इंटरनेटवर जशा मिळतात तशा आणि त्या संख्येने समोरासमोर मिळण्याची शक्यता कमीच. नवीन लेखकांनी स्वतःच्या करियरची सुरुवात ई पुस्तकांतूनच करावी.
- वाचकांनीही आपली जबाबदारीचा वाटा उचलावा. आपल्या ओळखीच्या आठ वाचकांचे ई मेल पत्ते आम्हाला कळवावे. त्यायोगे हा वृक्ष बहरत जाईल. आज पावणेदोन लाखांच्या घरात असलेला ई साहित्य प्रतिष्ठानचा वाचकवर्ग लवकरच दहा ते बारा लाखांपर्यंत पोहोचावा हे उद्दिष्ट आहे. बारा लाख म्हणजे फ़ार नाही. बारा कोटी मराठी माणसाचा फ़क्त एक टक्का. तेवढा तरी आपण कव्हर करू या. तेवढे तरी वाचक आपण जमा करू या. त्यांना नवीन आणि जुन्या चांगल्या लेखकांचे भारी भारी साहित्य देऊ या. वाचन संस्कृतीला मोबाईलच्या स्मार्ट युगात नेऊया.

ई साहित्य प्रतिष्ठानचं तिनशेवं पुस्तक लवकरच येत आहे. चार साडेचार वर्षांत तिनशे पुस्तकं. पावणेदोन लाख वाचक. साताठ लाख वेबसाईट व्हिजिट्स. बारा लाखांचं उद्दिष्ट.

कोण म्हणतो मराठी भाषेचं काही खरं नाही? महाराष्ट्र आणि मराठी भाषा कुठच्या कुठे जाईल पहा. नेऊया! तुम्ही आणि आम्ही.

esahity@gmail.com


# ई साहित्य प्रतिष्ठान

फ़ोन : 9869674820

esahity@gmail.com

पत्ता : जी ११०२, इटर्निटी

तीन हात नाका , ठाणे, ४००६०४


## Websites

*www.esahity.com*

*www.ednyaneshwari.com*

*http://etyarth.blogspot.in/*

*http://esahityapratishthan.blogspot.in/*

*www.marathiriyasat.com*